हवा प्रदूषण (प्रतिबंध व नियमन) संदर्भात मा. राष्ट्रीय हरित लवाद, नवी दिल्ली यांच्या निर्देशानुसार राज्य स्तरीय हवा गुणवत्ता सनियत्रंण समिती ( Air Quality Monitoring Committee) स्थापन करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पर्यावरण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एनसीए २०१८/प्र.क्र.१९६/तां.क.-२

१५वा मजला, नविन प्रशासन भवन, हुतात्मा राजगूरू चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: ३१ डिसेंबर, २०१८

**वाचा -**

१) पर्यावरण (संरक्षण ) अधिनियम , १९८६ आजपर्यंत दूरूस्ती केल्याप्रमाणे.
२) हवा (प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण) अधिनियम,१९८१ आजपर्यंत दुरूस्ती केल्याप्रमाणे.
३) मा. राष्ट्रीय हरीत लवाद, मुख्य खंडपीठ, नवी दिल्ली यांचा दिनांक ०८ ऑक्टोबर, २०१८ रोजीचा आदेश.

**प्रस्तावना :-**

मा. राष्ट्रीय हरीत लवाद, नवी दिल्ली यांच्या दिनांक ०८ ऑक्टोबर, २०१८ रोजीच्या च्या निर्देशानुसार तसेच केंद्रीय प्रदुषण नियंत्रण मंडळाच्या दिनांक ०५ नोव्हेबर २०१८ च्या पत्रानुसार हवा प्रदूषण (प्रतिबंध व नियमन) संबंधित कायद्यांच्या तरतुदींच्या योग्य अनुपालनासाठी १७ शहरामधील हवा प्रदुषण नियंत्रणकारिता कृती आराखडा तयार करण्यास महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई यांना निर्देश देण्यात आले होते. तसेच मा.राष्ट्रीय हरित लवाद, नवी दिल्ली यांच्या आदेशानुसार सदर कृती आराखडे अंतीम करण्याकरिता राज्यस्तरीय समिती गठित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय जारी करण्यात येत आहे.

### शासन निर्णय :-

मा. राष्ट्रीय हरीत लवाद, मुख्य खंडपीठ, नवी दिल्ली यांनी दिलेल्या निर्देशानुसार खालील प्रमाणे राज्य स्तरीय हवा गुणवत्ता सनिंयंत्रण समिती ( Air Quality Monitoring Committee) गठीत करण्यात येत आहे असून या समितीचा आढावा मा. मुख्य सचिव नियमीतपणे घेतील

| अनु.क्र. | सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, महाराष्ट्र शासन , मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव, उद्योग विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | सचिव, नगर विकास विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव , कृषी विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | सचिव, परिवहन विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६ | संचालक, (पर्यावरण ) मुंबई | सदस्य |
| ७ | सदस्य सचिव , महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ | सदस्य सचिव |

राज्य स्तरीय समितीच्या कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहतील :-

१) सदर समिती विशेषत: उपरोल्लेखित आदेशातील तरतूदी तसेच हवा प्रदूषण (प्रतिबंध व नियंत्रण) संबंधित कायद्यातील तरतुदींचे अनुपालन करण्यासाठी जबाबदार राहील.

२) समितीने कृती आराखडा तयार करावा व त्याचे पूर्व वितरण करून त्याच्या अंमलबजावणीची दक्षता घ्यावी.

३) एखाद्या प्रसंगी समितीच्या ध्येय धोरणांची परिणामकारक अंमलबजावणी करण्यासाठी दुसऱ्या विभागातील, अथवा संशोधन संस्थांतील अधिकारी/ तज्ज्ञ यांना आमंत्रित करण्याचे अथवा वेळप्रसंगी त्यांच्यावर समन्स बजावण्याचे अधिकार राज्य समितीच्या अध्यंक्षाना असतील. अशा व्यक्ती /तज्ज्ञ यांना समितीसमोर उपस्थित राहून ती माहिती देणे बंधनकारक आहे.

४) सदर समितीव्दारे मा. राष्ट्रीय हरीत लवादांच्या आदेश दिनांक ०८ ऑक्टोबर, २०१८ मध्ये समाविष्ट केलेल्या निर्देशांचे पालन केले जाईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२३१७०६२४०१०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shuddhodhan D Aher

Digitally signed by Shuddhodhan D Aher
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=19193e305825f30c0c7381430cc0f9fc9d9e4c47c2406ef9eca6ab6b77af1844,
serialNumber=d9ed3af978d744c807b97e5551edcd2ab6f11c5495f5d6ef4863887d2775315c, cn=Shuddhodhan D Aher
Date: 2019.01.23 17:14:56 +05'30'

**(शु. द. आहेर)**
**उपसचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
२) मा. मंत्री (पर्यावरण) यांचे स्वीय सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३) मा. राज्य मंत्री (पर्यावरण) यांचे स्वीय सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ३२
५) अपर मुख्य सचिव, उद्योग विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय मुंबई
६) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय मुंबई
७) प्रधान सचिव, कृषी विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
८) सचिव, गृह विभाग (परीवहन) महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
९) संचालक, (पर्यावरण), मुंबई
१०) संदसय सचिव, महाराष्ट प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई